**परतवाडा शहरातून वाहणा-या बिच्छन नदीवर प्रस्तावित पूर संरक्षक भिंतीच्या कामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

शासन निर्णय क्रमांक: प्रशामा-**२०२१/ (प्र.क्र. २१६/२०२१)/ सिं.व्य.(महसूल)**

मंत्रालय, मुंबई ४०००३२,

दिनांक: १५/०३/२०२४

**वाचा :** १) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू १०९२/१७०-सिंव्य,(कामे) दिनांक ७ ऑगस्ट, १९९२

२) शासन निर्णय क्र. पूसंभि २०१९/(प्र.क्र.११५/२०१९) सिंव्य.म.दि.३१/८/२०१९

३) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र जा.क्र. २१३५/ विपाविम /का.तां.४ / सपन नदी / (धा.क्र. /१९) २०२१ दि. २५.०३.२०२१.

**प्रस्तावना :-**

बिच्छन नदीचा उगम हा चिखलदरा तालुक्यातील मौजा धारखोरा येथे झाला असून, परतवाडा शहराच्या वरच्या बाजूने बिच्छन नदीवर मल्हारा येथे गोंडविहिर लघु प्रकल्प सन १९७७ ला तयार करण्यात आला आहे. सदर गोंडविहिर प्रकल्पाची संचयन क्षमता २.३८५५ द.ल.घ.मी. आहे, व पाणलोट क्षेत्र २६.५४ चौ.कि.मी. आहे. सदर बिच्छन नदी परतवाडा शहराच्या मध्य भागातून वाहते.

सध्य स्थितीत परतवाडा शहरातून वाहणा-या बिच्छन नदी मध्ये झाडे झुडपे वाढलेली आहे तसेच नदी पात्रात गाळ सुध्दा वाढलेला आहे. परतवाडा शहराच्या विस्तारीकरणामुळे शहरातील सांडपाणी बिच्छन नदीत प्रवाहित होते. मा. श्री ओमप्रकाश उर्फ बच्चू कडू ,राज्यमंत्री जलसंपदा विभाग यांची दिनांक २०/०६/२०२० रोजी अधीक्षक अभियंता उर्ध्व वर्धा सिंचन मंडळ अमरावती तसेच कार्यकारी अभियंता मध्यम व लघु पाटबंधारे विभाग यांचे सह प्रत्यक्ष स्थळ पाहणी मध्ये परतवाडा शहरातून वाहणा-या बिच्छन नदीचे खोलीकरण व काही भागात पूर संरक्षक भिंत बांधकाम करणे तसेच परतवाडा शहरातील सांडपाणी गोळा करून बंदिस्त नलीकेव्दारे शहराबाहेर बिच्छन नदीमध्ये सोडण्याचा प्रस्ताव तयार करण्याचे निर्देश देण्यात आले. परतवाडा शहरातून वाहणा-या बिच्छन नदीवरील पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर अंतर्गत परतवाडा शहरातून वाहणा-या बिच्छन नदीवरील पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या कामासाठी रू **२४,९१,६९७३९.००- ( चोवीस कोटी एक्याण्णव लक्ष एकोण सत्तर हजार सातशे एकोणचाळीस**) एवढया खर्चाच्या जलसंपदा विभागाच्या सन २०२२-२३व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) शासन निर्णय क्रमांक पुसंभि-२०१९/(प्र.क्र.११५/२०१९)/सिंव्य(म) दिनांक ३१/०८/२०१९ मधील तरतूदी नुसार कार्यवाही करावी.

ब) शासन परिपत्रक क्र. एफडीडब्ल्यू-१०८९/२४३/८९/सिंव्य(कामे), दि. २१.९.१९८९ व दि.३/५/२०१८ नुसार पूर रेषा आखणी केल्यानंतरच पूर संरक्षक भिंतीची संरेखा निश्चित करावी.

क) सदर अंदाजपत्रक उपरोक्त शासन निर्णयामधील परिच्छेद ११ “अ” मध्ये नमुद केल्याप्रमाणे ५ कोटीपेक्षा जास्त रकमेचे असल्याने अंदाजपत्रकामध्ये सादर केलेल्या संकल्पनासमध्यवर्ती संकल्पचित्र संघटनेकडून मंजूरी घेणे आवश्यक आहे.

ड) भिंतीच्या बांधकामासाठी भूसंपादन करू नये, बांधकामासाठी आवश्यक जमीन संबंधितांनी विनामोबदला उपलब्ध करून द्यावी, पूर संरक्षक भिंतीच्या बांधकामामुळे नदीप्रवाहाला अडथळा निर्माण होणार नाही याची, दक्षता घ्यावी.

ई) पूर संरक्षक योजना राबविल्यानंतर परिसरातील पाण्याचा निचरा योग्य पध्दतीने होईल, याची दक्षता नियोजनात घ्यावी.

प) ही कामे करताना शहरातील सांडपाणी बंदिस्त नलिकेद्वारे शहराच्या बाहेर नदीत सोडणे, जॉगिंग ट्रॅक तयार करणे, सौंदर्यीकरण करणे इ. पूर नियंत्रण व्यतिरिक्त स्वरुपाची कोणतीही कामे करु नये.

प) सदर योजना पूर्ण झाल्यानंतर पूर संरक्षक परतवाडा शहरातून वाहणा-या बिच्छन नदीवरील पूर संरक्षक भिंत बांधकामाच्या कामाच्या प्रस्तावास, ता. अचलपूर, जि. अमरावती नगर परिषदेने ताब्यात घेऊन भविष्यातील देखभाल व दुरूस्ती करावयाची आहे. तांत्रिक मान्यता देण्यापूर्वी तसे लेखी बंधपत्र संबधित नगरपरिषदेकडून प्राप्त करून घेण्याची जबाबदारी तांत्रिक मान्यता देण्यास सक्षम अधिका-यांची असेल.

फ) काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास त्वरीत उपलब्ध करून द्यावे.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च “४७११ पुरनियंत्रण प्रकल्पावरील भांडवली खर्च, १९०- सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (०१) (०५) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर भागभांडवली अंशदान (४७११ २८८३ )” या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातुन भागविण्यात यावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य. (महसुल) कार्यासनाच्या नोंदवहीमध्ये क्र. ३०/सन २०२४ वर नोंदविण्यात आलेली आहे.

वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ १४६४ व नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ ९१० च्या सहमतीनुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावर www.maharashtra.gov.in उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक २०२४०३१६२०२४३७९०२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SONAL ANAND GAIKWAD

Digitally signed by SONAL ANAND GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=2de9efbff657631a65d78997e0ca3abe497df4a58a3780cae2980bef45f5c5e1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F9F2A1323FB2F904BB9F38B4E7461B2C05FBB18A306A192E2149168DAABEC890, cn=SONAL ANAND GAIKWAD
Date: 2024.03.16 20:34:04 +05'30'

**(सो.आ.गायकवाड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. मा. राज्यपाल यांचे अपर मुख्य सचिव, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री (जलसंपदा/वित्त व नियोजन) यांचे कार्यालय.
४. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन,मुंबई
५.मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
७. मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
८. मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
९. प्रधानसचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१०. सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११.महालेखापाल-१ (लेखावअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१२. महालेखापाल-२ (लेखावअनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१३. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, नागपूर,
१४. मुख्यअभियंता, (जसं), जलसंपदा विभाग, अमरावती
१५. आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१६. अधीक्षक अभियंता, उर्ध्व वर्धा सिंचन मंडळ, अमरावती
१७.सिं.व्य.(महसूल)कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक: प्रशामा-**२०२१/ (प्र.क्र. २१६/२०२१)/ सिं.व्य.(महसूल)**

**दि. १५/०३/२०२४ चे सहपत्र**

| **अ.क्र.** | **Description of Item** | **पडताळणी नंतरची (रु.)** |
|---|---|---|
| १ | C - Works (excluding Royalty) | १९६१३८६३३.०० |
| २ | Royalty | ९८८०६०७.०० |
| ३ | १ % Insurance | १९६१३८६.०० |
| ४ | १८ % GST | ३५३०४९५४.०० |
| ५ | ३ % Contingencies | ५८८४१५९.०० |
| | **Total Rs.** | **२४९११६९७३९.००** |

SONAL ANAND GAIKWAD

Digitally signed by SONAL ANAND GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=2de9efbff657631a65d78997e0ca3abe497df4a58a3780cae2980bef45f5c5e1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F9F2A1323FB2F904BB9F38B4E7461B2C05FBB18A306A192E2149168DAABEC890, cn=SONAL ANAND GAIKWAD
Date: 2024.03.16 20:34:22 +05'30'

**(सो. आ. गायकवाड)**

**शासनाचे अवर सचिव**